२०११०३१९११०५२४००१

पिंपरी-चिंचवड महानगरपालिका

हातगाडी परवाना फी कमी करण्याच्या ठरावाची अंमलबजावणी स्थगित करणे.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन आदेश क्र. पीसीसी ३०९३/७६/प्र.क्र. ५/९३/नवि. २२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : ३१ ऑगस्ट, १९९४

पहा : आयुक्त, पिंपरी - चिंचवड महानगरपालिका यांची पुढील पत्रे
१] क्र. अति/कावि/४/११८/९३/दि. १५ जानेवारी, १९९३
२] क्र. अेअेमसी/अे×११/कावि/१८५, दि. २ जून, १९९३

पार्श्वभूमी :- पिंपरी-चिंचवड महानगरपालिका क्षेत्रात हातगाड्यांद्वारे व्यवसाय करणा-यावर महानगरपालिकेचे नियंत्रण असावे म्हणून मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ४५८[३०] अन्वये हातगाड्यांना परवाना देण्याचे उपविधी महानगरपालिकेने शासनाची मंजुरी घेऊन सन १९८५ मध्ये तयार केलेले आहेत. मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ३८६[२] मधील तरतुदीनुसार पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेने दि. २४ फेब्रुवारी, १९८८ रोजी ठराव क्र. ५९२ पारीत करून फिरत्या हातगाडीसाठी वार्षिक फी रु १५०/- व स्थिर हातगाडीसाठी वार्षिक फी रु २००/- परवाना फी लावण्याचे ठरविले असून या दराप्रमाणे सन १९८८ पासून परवाना फी वसूल केली जात आहे.

पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेने दिनांक २९ ऑक्टोबर, १९९१ रोजी ठराव क्र. २०२७ पारीत करून फिरत्या हातगाडीसाठी वार्षिक फी रु२५/- व स्थिर हातगाडीसाठी वार्षिक फी रु ५०/- असे कमी केलेले दर दि. १ एप्रिल, १९९१ पासून अंमलात आणण्यास व यापूर्वी ज्यांनी वाढीव दराने फी भरलेली आहे ती वाढीव रक्कम पुढील आर्थिक वर्षात समायोजित करण्यास मान्यता दिली आहे. थोडक्यात महानगरपालिकेने सुधारित केलेले दर दि. १ एप्रिल, १९९१ पासून अंमलात येणार नसून ते सन १९८८ पासून अंमलात येणार आहेत. हातगाड्यांना परवाना देणे व त्यावर नियंत्रण ठेवणे इत्यादीसाठी आस्थापनेवर होणारा खर्च विचारात घेऊन सन १९८८ मध्ये महानगरपालिकेने ठरविलेल्या दरात दिवसेंदिवस होत असणारी महागाई विचारात घेऊन वाढ करणे आवश्यक असताना त्या दरात अशी घट करण्यामुळे महानगरपालिकेचे दरवर्षी अंदाजे ४,२६,५२५ रुपयांचे नुकसान होणार असून या ठरावाची अंमलबजावणी केल्यास आस्थापना खर्च देखील वसूल होणार नाही. शिवाय

फीचे दर कमी करण्यासाठी कोणाकडूनही मागणी आलेली नसताना व तसेच आयुक्ताकडून रितसर प्रस्ताव सादर केला गेला नसताना महानगरपालिकेने स्वत:हून असा निर्णय घेणे म्हणजे महानगरपालिकेचे आर्थिक नुकसान करणे व कलम ३८६ [२] मधील तरतुदीचे उल्लंघन करणे होय.

शासन आदेश :- वरील पार्श्वभूमी विचारात घेता शासनाचे असे मत झाले आहे की, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ३८६ [२] मधील तरतुदीचे पालन न करता पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेने दिनांक २९ ऑक्टोबर, १९९१ रोजी ठराव क्र. २०२७ पारीत केलेला असून त्याची अंमलबजावणी केल्यास महानगरपालिकेचे आर्थिक नुकसान होणार आहे. सबब मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ चे कलम ४५१ [१] अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून महाराष्ट्र शासन या आदेशाव्दारे पिंपरी-चिंचवड महानगरपालिका ठराव क्र. २०२७ ची अंमलबजावणी एक वर्षाच्या मुदतीकरिता स्थगित ठेवण्यास मंजूरी देत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

[ शा. ना. गवळी ]
उप सचिव

प्रति,
महापौर,
पिंपरी-चिंचवड महानगरपालिका,
पिंपरी, पुणे

आयुक्त,
पिंपरी-चिंचवड महानगरपालिका,
पिंपरी, पुणे

निवड नस्ती [नवि.२२]